महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांना देण्यात येणाऱ्या व्यवस्थापकीय अनुदानाची मुदत वाढविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आविम-२०११/प्र.क्र.१८०/का.-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: २८ नोव्हेंबर, २०१४.

**वाचा:-**

१) शिक्षण, क्रीडा व सामाजिक न्याय विभाग शासन निर्णय क्र.:-STW १३७१/१०५६८१-J, दि.१४/१/१९७२.

२) सामाजिक न्याय व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.:-TDC १०७७/१३७३३/XXIV(II), दि.६/२/१९८२.

३) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.:-आविम-१०९७/प्र.क्र.६/का.३, दि.१९/३/१९९८.

४) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.:-आविम-२००४/प्र.क्र.१५/का.३, दि.२४/८/२००४.

५) महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचे पत्र क्र.आविम/प्रशा/अस्था-२/२६१३/११, दि. १/१०/२०११.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक ची निर्मिती संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये सहकार कायदा १९६० अंतर्गत १९७२ मध्ये करण्यात आली. सन १९७७ मध्ये शासनाने महामंडळाची रचना व कामकाज यामध्ये बदल करुन वैयक्तिक सभासदत्व रद्द करुन आदिवासी सहकारी संस्थांना महामंडळाचे सभासद करण्यात आले. सन १९७८ पासून शासन आदेशान्वये विविध योजना महामंडळामार्फत राबविण्यात येत आहेत. या योजनांच्या अंमलबजावणीसाठी महामंडळास प्रथम १९८६ मध्ये १३३१ पदे व तद्नंतर सन १९९९ मध्ये ६० पदे अशी एकूण १३९१ पदे मंजूर करण्यात आली. सन १९९९ मध्ये शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाची स्थापना झाल्यावर वरील पैकी ९३ पदे शबरी महामंडळाकडे वर्ग करण्यात आली असून सध्या आदिवासी विकास महामंडळाकडे १२९८ मंजूर पदे शिल्लक आहेत.

संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयान्वये महामंडळास पुढील १० वर्षापर्यंत अथवा महामंडळ स्वावलंबी होईपर्यंत, संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयानुसार १९९२ ते २००२ पर्यंत आणि संदर्भ क्र.४ अन्वये सन २०१२ पर्यंत व्यवस्थापकीय अनुदान देण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

प्रस्तुत व्यवस्थापकीय अनुदानाची मुदत १० वर्षे म्हणजे सन २०२२ पर्यंत वाढवून मिळावी म्हणून व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांनी संदर्भ क्र.५ वरील पत्रान्वये शासनास विनंती केली होती.

उक्त प्रस्तावास अनुलक्षून महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदानाची मुदत पुढील १० वर्षे म्हणजेच सन २०२२ पर्यंत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास देण्यात येणाऱ्या व्यवस्थापकीय अनुदानाची मुदत संपलेली असल्यामुळे सदर मुदत पुढील १० वर्षे म्हणजेच सन २०२२ पर्यंत वाढविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. ही मुदत दिनांक १/४/२०१२ ते ३१/३/२०२२ पर्यंत लागू राहील.

२. दिनांक ६/२/१९८२ च्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार महामंडळाने योजनांच्या अंमलबजावणीतून झालेला नफा शासनास नियमितपणे परत करणे आवश्यक आहे. अन्यथा महामंडळाला प्रशासकीय खर्चासाठी व्यवस्थापकीय अनुदान देण्यात येणार नाही.

३. यापूर्वी व्यवस्थापकीय अनुदानास मुदतवाढ देतांना निर्गमित केलेल्या शासन निर्णयांमध्ये (दि.१४/१/१९७२, ६/२/१९८२, १९/३/१९९८ व २४/८/२००४ चे शा.नि.) विहित केलेल्या अटींच्या अधिन राहून दि. १/४/२०१२ च्या पुढे १० वर्षे मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. निधीच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने आवश्यक उपाययोजना करुन निधी गुंतवणूकीसंदर्भात शासनाच्या मार्गदर्शक सूचनांचे कसोशीने पालन करण्यात यावे व त्यास संचालक मंडळाची मान्यता घेण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२९/१४ साउ, दि.१२/९/२०१४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४११२८१६२३१६५२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DESHPANDE CHANDRASHEKHAR J

Digitally signed by DESHPANDE CHANDRASHEKHAR J
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=MTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DESHPANDE CHANDRASHEKHAR J
Date: 2014.12.01 11:48:56 +05'30'

**( चं.ज.देशपांडे )**

शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
२) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३) सहकार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

७) वित्त विभाग (साउ/व्यय-१४/अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.

८) संचालक, लेखापरीक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक ॲन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.

९) कक्ष अधिकारी (कार्या-१५) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) कक्ष अधिकारी (कार्या-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती, कार्यासन-३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.